केंद्र शासन पुरस्कृत पीएम ईबस सेवा योजना- करिता नवीन लेखाशिर्ष उघडणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: पीबसे-०४२४/प्र.क्र.५४/नवि-३२**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०००३२.
दिनांक : १९ जून, २०२४

**संदर्भ :-**

१. पीएम-ई बस सेवा योजनेसाठी केद्र शासनाने दि. २६ ऑगस्ट, २०२३ रोजी निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना.
२. नगर विकास विभाग शासन निर्णय क्र. पीबसे-२०२४/प्र.क्र. ४० /नवि-३२, दि. ०७ मार्च, २०२४

**प्रस्तावना :-**

देशातील परिवहन सेवेमध्ये सुधारणा करण्याच्या दृष्टीने व हवेतील प्रदूषण कमी करण्याच्या दृष्टीने शाश्वत उपाय योजनेच्या अनुषंगाने केंद्र शासनाने दि. १६ ऑगस्ट, २०२३ रोजी केंद्र पुरस्कृत पीएम ई-बस सेवा योजना मंजूर केली आहे. या योजनेंतर्गत विविध राज्ये व केंद्र शासित प्रदेशांमार्फत देशभरात १०,००० ई-बसेस चालविण्याचे केंद्र शासनाचे उदिष्ट आहे. केंद्र शासनाने ही योजना देशातील १६९ शहरांसाठी लागू केली असून यात राज्यातील २३ महानगरपालिकांचा समावेश आहे. मा.राज्य मंत्रिमंडळाच्या मान्यतेने नगर विकास विभागाच्या दि.०७ मार्च,२०२४ च्या शासन निर्णयान्वये सदर योजना राज्यात राबविण्यास शासन मान्यता देण्यात आली आहे. प्रस्तुत योजनेंतर्गत केंद्र व राज्य शासनाचे अर्थसहाय्य प्राप्त होणार असल्याने सदर निधी अर्थसंकल्पीत करण्यासाठी नवीन लेखाशिर्ष उघडण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यातील २३ महानगरपालिकांमध्ये केंद्र पुरस्कृत पीएम ई-बस सेवा योजना राबविण्यासाठी केंद्र शासनाने या योजनेच्या अंमलबजावणीसाठी निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचनेनुसार राज्यातील पात्र २३ महानगरपालिकांच्या सार्वजनिक खाजगी भागीदारी तत्वावर ई-बसेसचे कार्यान्वयनाकरिता अनुज्ञेय केंद्रीय व राज्य अर्थसहाय्याकरिता निधी अर्थसंकल्पीत करण्यासाठी खालीलप्रमाणे लेखाशिर्ष उघडण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| | **मागणी क्र.एफ-०२** | | **Demand No.F-02** |
|---|---|---|---|
| ३०५५ | मार्ग परिवहन | 3055 | Road Transport |
| ०० | | 00 | |
| १९१ | महानगरपालिकांना सहाय्य | 191 | Assistance to Municipal Corporations |
| ०१ | पीएम - ई बस सेवा | 01 | PM-eBus Sewa |
| (०१)(०१) | पीएम -ई बस सेवा अंतर्गत बस संचालनासाठी सहाय्य (केंद्र हिस्सा) **(३०५५००९९)** | (01)(01) | Assistance for bus operations under PM-eBus Sewa (Central Share) **(30550099)** |

| | | | |
|---|---|---|---|
| (०१)(०२) | पीएम-ई बस सेवा अंतर्गत बस संचालनालसाठी सहाय्य (राज्य हिस्सा) **(३०५५०१०५)** | (01)(02) | Assistance for bus operations under PM-eBus Sewa (State Share) **(30550105)** |
| (०१)(०३) | पीएम-ई बस सेवा अंतर्गत बस डेपोच्या विकास /उन्नतीसाठी सहाय्य (केंद्र हिस्सा ६० टक्के) **(३०५५०११४)** | (01)(03) | Assistance for development / up gradation of bus depot under PM-eBus Sewa (Central Share 60 %) **(30550114)** |
| (०१)(०४) | पीएम-ई बस सेवा अंतर्गत बस डेपोच्या विकास /उन्नतीसाठी सहाय्य (राज्य हिस्सा ४० टक्के) **(३०५५०१२३)** | (01)(04) | Assistance for development / up gradation of bus depot under PM-eBus Sewa (State Share 40%) **(30550123)** |
| (०१)(०५) | पीएम-ई बस सेवा अंतर्गत मीटरच्या मागे उर्जेच्या पायाभूत सुविधा (केंद्र हिस्सा १०० टक्के) **(३०५५०१३२)** | (01)(05) | Behind-the-Meter Power Infrastructure under PM-eBus Sewa (Central Share 100 %) **(30550132)** |
| | कार्यक्रम / दत्तमत | | Scheme/Voted |

२. केंद्र पुरस्कृत योजनांच्या निधी वाटपासंदर्भात केंद्र शासनाच्या दि. २३.०३.२०२१ च्या पत्रान्वये विहीत केलेल्या तसेच राज्य शासनाच्या वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र. संकीर्ण-२०२१/प्र.क्र.३५/कोषा प्रशा-४, दि. ०१.०७.२०२१ अन्वये तसेच केंद्र शासनाच्या दि.०३.०२.२०२३. व दि.१९.०६.२०२३ च्या मार्गदर्शक सुचना तसेच या योजनेबाबत वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशांचे तंतोतंत पालन करावे.

३. सदर शासन निर्णय वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र.२४३/व्यय-३ दि. ०७.०५.२०२४, भारतीय लेखापरीक्षा और लेखा विभाग महालेखाकार कार्यालय, मुंबई यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.सं:ख.वि/चा-१/नगर विकास विभाग/युओआर-२९/२०२४-२५/२०४, दि. १७.०५.२०२४ अन्वये दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०६१९११४९२४२९२५ असा आहे. सदरहू शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHRIKANT CHANDRAKANT ANDGE

Digitally signed by SHRIKANT CHANDRAKANT ANDGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D8D9626C9E038380CD235C048F20D7CE74CFFD3A95F2AC3C192E9C991F358271, cn=SHRIKANT CHANDRAKANT ANDGE
Date: 2024.06.19 12:05:50 +05'30'

( श्रीकांत आंडगे )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.

२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.

३. मा. उप मुख्यमंत्री तथा वित्त व नियोजन मंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
७. प्रधान सचिव (नवि-१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
८. प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
९. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई
१०. आयुक्त, महानगरपालिका ( सर्व)
११. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - १/२, मुंबई / नागपुर
१२. महालेखापाल (लेखापरिक्षा)- १/२, मुंबई/ नागपुर
१३. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
१४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१५. जिल्हा कोषागार अधिकारी ( सर्व)
१६. सह सचिव / उप सचिव/ अवर सचिव / कक्ष अधिकारी ( सर्व) , नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१७. निवड नस्ती (नवि-३२).